“सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२४/प्र.क्र.०६/शिक्षण-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १८ मार्च, २०२५

**संदर्भ :-** १. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०१८/प्र.क्र.११८/ शिक्षण, दि. ११.१०.२०१८

२. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२२/प्र.क्र.१५/ शिक्षण-२, दि. १३.१०.२०२२

३. शासन निर्णय क्र.शिवृत्ती -२०२१/ प्र.क्र-१५/शिक्षण -२ दि.०५.०१.२०२३

४. शासन निर्णय क्र.शिवृत्ती -२०२३/ प्र.क्र-०५/शिक्षण -२ दि.२८.०३.२०२३ व दि.२५.०९.२०२३

५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे दि.२८.०२.२०२५ रोजीचे चे पत्र.

**प्रस्तावना:-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासप्रवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील मुलामुलींना परदेशी उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शासन निर्णय संदर्भ क्र.१ दिनांक ११.१०.२०१८ च्या तरतूदीनुसार सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षासाठी शासन निर्णय संदर्भ क्र.२ दिनांक १३.१०.२०२२ नुसार ५० विद्यार्थ्यांची निवड करण्यात आली आहे. सन २०२२-२३ करिता परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी पुणे विभागातील साहिल मिलिंद मोराणकर या विद्यार्थ्याची USA University Of Southern California या विदयापिठात Master Of Computer Science या २ वर्ष कालावधीच्या अभ्यासक्रमासाठी परदेश शिष्यवृत्ती सन २०२२ -२३ करिता निवड करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने सदर विदयार्थ्यास त्याचे प्रथम वर्षातील प्रथम व द्वितीय सत्राकरिता एकुण रू. ४७,२४,९१४/- (अक्षरी सत्तेचाळीस लक्ष चोवीस हजार नऊशे चौदा फक्त) इतकी शिष्यवृत्ती अनुक्रमे संदर्भीय शासन निर्णय क्र. ३ व ४ अन्वये मंजूर करण्यात आली आहे.

सदयस्थितीत सदर विद्यार्थ्याने परदेशातील शैक्षणिक कालावधीच्या व्दितीय वर्षातील प्रथम व व्दितीय सत्राकरिता केलेल्या निधी मागणीनुसार संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय पुणे यांनी संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये प्रचलित शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार साहिल मिलिंद मोराणकर यास द्वितीय वर्षाच्या शिष्यवृत्तीकरिता देय रक्कम रु.३७,७७,४५४/- (अक्षरी रक्कम रू.सदतीस लक्ष सत्याहत्तर हजार चारशे चौपन्न फक्त) इतका निधी वितरीत करण्याबाबत प्रस्तावित केले आहे. यास्तव सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी पुणे विभागातील साहिल मिलिंद मोराणकर या विद्यार्थ्यास परदेशातील ०२ वर्ष या कालावधीच्या अभ्यासक्रमासाठी द्वितीय वर्षाकरिताची देय रक्कम रु.३७,७७,४५४/- (अक्षरी रक्कम रू.सदतीस लक्ष सत्याहत्तर हजार चारशे चौपन्न फक्त) खालील तक्यातील तपशिलानुसार वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | विद्यार्थ्याचे नाव | शैक्षणिक कालावधी | चलन | शिक्षण शुल्क | निर्वाह भत्ता | आरोग्य विमा | विमान प्रवास | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | साहिल मिलिंद मोराणकर | २ वर्ष | १ USD = ८५.८६९४ | USD$ २९०८८ रु. २४,९७,७६९/- (व्दितीय वर्ष) | USD$ १५४०० रु. १३,२२,३८९/- (व्दितीय वर्ष) | USD$ ९९५ रु. ८५,४४०/- (व्दितीय वर्ष ) | --- | रु.३९,०५,५९८/- सदर विदयार्थ्यास प्रथम वर्षातील ज्यादा प्रदान केलेले शिक्षण शुल्क $१४९२.३१ = रू.१,२८,१४४/-इतकी रक्कम वजा जाता **एकुण देय रक्कम = ३९,०५,५९८ -१,२८,१४४ = रू.३७,७७,४५४/-** (व्दितीय वर्ष ) |

२. उपरोक्तप्रमाणे निधी वितरणासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हा निहाय/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. परदेशी शिष्यवृत्ती अंतर्गत शासन निर्णय संदर्भ क्र. १ दि. ११.१०.२०१८ व शासन शुद्धिपत्रक दि. २४.०१.२०२३ व दि.१६.०३.२०२३ मधील अटी व शर्तीची पुर्तता करुन संबंधित विद्यार्थ्यांचे निधी मागणीचे प्रस्ताव तपासून निधी मंजूर करावा.

४. सदर निधी खर्च करतांना वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तींचा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

५. सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक झेडजी-०३ (०२) (१८) विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परेदशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (२२२५ एफ २१८)" या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध केलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३१८१६१३३०३३३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIVEDITA LOKESH WARULE

Digitally signed by NIVEDITA LOKESH WARULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=3ef8c2c4c081462a26dea72c10274caaa77d92363242a1bff9454421d88652f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8A41558A05225BDD429CBDFA69D2436A1EA3BC5173099C377F9F8B13C78A9D57, cn=NIVEDITA LOKESH WARULE
Date: 2025.03.18 16:14:28 +05'30'

**( नि. लो. वारूळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, पुणे.
७. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
८. मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवडनस्ती (शिक्षण-२)